मा.राज्यसभा, मा.लोकसभा, मा.विधानपरिषद व मा.विधानसभा सदस्य यांना शासनस्तरावर ना-देय प्रमाणपत्र उपलब्ध करुन देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र.७/मि.व्य.२**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**
**दिनांक : ८ जानेवारी २०२०.**

**प्रस्तावना :**

राज्यातील मा.राज्यसभा सदस्य, मा.लोकसभा सदस्य, मा.विधानपरिषद सदस्य व मा.विधानसभा सदस्य यांना निवडणूकांपूर्वी किंवा इतर कामांसाठी राज्यातील सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सर्व कार्यकारी अभियंता कार्यालयांकडून ना-देय प्रमाणपत्र प्राप्त करुन घ्यावे लागतात. त्यामुळे या मा.सदस्यांना सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संबंधीत सर्व कार्यकारी अभियंता कार्यालयांकडे संपर्क करावा लागतो. यासंदर्भात प्राप्त होत असलेल्या तक्रारी व ना-हरकत प्रमाणपत्रे मिळण्यास होणारा विलंब यास्तव राज्यातील मा.राज्यसभा सदस्य, मा.लोकसभा सदस्य, मा.विधानपरिषद सदस्य व मा.विधानसभा सदस्य यांना, एकाच ठिकाणी (Single Window) ना-देय प्रमाणपत्र उपलब्ध करुन देण्याची बाब शासन स्तरावर विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यातील मा.राज्यसभा सदस्य, मा.लोकसभा सदस्य, मा.विधानपरिषद सदस्य व मा.विधानसभा सदस्य यांना यापुढे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीतील शासकीय विश्रामगृहे/आमदार निवास/ सार्वजनिक बांधकाम विभागाशी संबंधीत इतर देय शासकीय रकमा याबाबत “ना-देय प्रमाणपत्र” एकाच ठिकाणाहून (Single Window) कार्यकारी अभियंता, इलाखा शहर (सा.बां.) विभाग, मुंबई, बांधकाम भवन, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई यांच्याकडून उपलब्ध करुन देण्यात येईल. सदर बाबतीत कार्यकारी अभियंता, इलाखा शहर (सा.बां.) विभाग, मुंबई, बांधकाम भवन, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई यांना यासाठी प्राधिकृत करण्यात येत आहे.

२. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांना वरील अनुषंगाने कळविण्यात येते की, त्यांनी आपल्या अधिपत्याखालील सर्व कार्यकारी अभियंता यांच्याकडुन मा.राज्यसभा सदस्य, मा.लोकसभा सदस्य, मा.विधानपरिषद सदस्य व मा.विधानसभा सदस्य यांच्याकडुन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारितील शासकीय विश्रामगृहे/आमदार निवास/सार्वजनिक बांधकाम विभागाशी संबंधीत, इतर देय शासकीय रकमा, याबाबत प्रत्येक वर्षाच्या दि.१ एप्रिल, दि.१ जुलै, दि.१ ऑक्टोबर व दि.१ डिसेंबर रोजी (त्रैमासिक) एकत्रित अहवाल अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई यांच्याकडे सादर करावा. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई यांना सदर बाबीसाठी संनियंत्रण अधिकारी म्हणुन प्राधिकृत करण्यात येत आहे.

**३. सदर अहवालाच्या आधारे वरीलप्रमाणे मा.सदस्यांना कार्यकारी अभियंता, इलाखा शहर (सा.बां.) विभाग, मुंबई यांच्यामार्फत "ना-देय प्रमाणपत्र" देण्याबाबतची कार्यवाही करण्यात येईल.**

**४. मा.सदस्यांकडून अर्ज प्राप्त झाल्याच्या दिनांकापासुन आठ दिवसांत "ना-देय प्रमाणपत्र" देणेबाबतची कार्यवाही कार्यकारी अभियंता, इलाखा शहर (सा.बां.) विभाग, मुंबई यांनी करावी.**

५. वर नमुद विहित कालावधीत मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग कार्यालयांकडुन विहित मुदतीत अहवाल प्राप्त न झाल्यास त्या प्रादेशिक विभागाची माहिती "निरंक" समजण्यात येऊन ना-देय प्रमाणपत्र देण्याबाबतची कार्यवाही करण्यात येईल व त्यासाठी संबंधीत मुख्य अभियंता हे सर्वस्वी जबाबदार राहतील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेतांक २०२००१०८१७४८०६९९१८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,**

Salunke Bapurao Popatrao

Digitally signed by Salunke Bapurao Popatrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=edca8a98bda16cdd38ff242769798f5e5400f388f00887df293e26ebd101bda6, serialNumber=e7530ea4ce1b9c2035e21cb89b458d475feb6882fc088c831b3e5c624de70c81, cn=Salunke Bapurao Popatrao
Date: 2020.01.08 17:35:11 +05'30'

**( बी. पी. साळुंके )**
**उप सचिव ( इमारती )**

**प्रति,**

१. मा. मंत्री ( सार्वजनिक बांधकाम ) यांचे स्विय सहायक
२. मा. राज्यमंत्री ( सार्वजनिक बांधकाम ) यांचे स्विय सहायक
३. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव ( रस्ते ), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव ( बांधकामे ), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग.
८. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ.
९. सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग.

**प्रत,**

**प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.**

सदरचा शासन निर्णय मा.राज्यसभा सदस्य / मा.लोकसभा सदस्य / मा.विधानपरिषद सदस्य / मा.विधानसभा सदस्य यांच्या निदर्शनास आणून देण्यात यावा.